RNI No. MAHBIL/2009/37831




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग चार – ब

वर्ष ३, अंक ७०] गुरुवार, ऑगस्ट २५, २०११/भाद्र ३, शके १९३३ [पृष्ठे ४

किंमत : रुपये १२.००

**असाधारण क्रमांक १३१**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र शासनाने महाराष्ट्र अधिनियमांन्वये तयार केलेले (भाग एक, एक-अ आणि एक-ल यांमध्ये प्रसिद्ध केलेले नियम व आदेश यांव्यतिरिक्त) नियम व आदेश.**

**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २५ ऑगस्ट २०११

**अधिसूचना**

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१.**

क्रमांक सेप्रनि.-२०११/सं.क्र.२६०/आस्था-१०.— महाराष्ट्र जिल्हा परिषदा आणि पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (१९६२ चा महा. पाच) कलम २७४, पोट-कलम (२) खंड ( एकोणचाळीस) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या आणि त्याबाबतीत महाराष्ट्र शासनाला समर्थ करणाऱ्या इतर सर्व अधिकारांचा वापर करून महाराष्ट्र शासन याद्वारे महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवाप्रवेश) नियम, १९६७ मध्ये सुधारणा करण्यासाठी पुढील नियम करीत आहे. हे नियम उक्त कलम २७४ च्या पोट-कलम (३) द्वारे आवश्यक असल्याप्रमाणे यापूर्वी प्रसिद्ध करण्यात आले आहेत.—

१. या नियमांना, महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवा प्रवेश) (सुधारणा) नियम, २०११ असे संबोधण्यात येईल.

२. महाराष्ट्र जिल्हा परिषदा जिल्हा सेवा (सेवा प्रवेश) नियम, १९६७ मधील परिशिष्ट-आठ मधील अ.क्र. ३ येथील नोंद जिल्हा तांत्रिक सेवा (वर्ग तीन) (दुय्यम ग्रामसेवक कार्यकारी आणि विस्तार), प्रथम श्रेणी आणि स्तंभ-३ मधील ग्रामसेवक पदासमोरील स्तंभ-४ मधील परिच्छेद-१ ऐवजी खालीलप्रमाणे मजकूर समाविष्ट करण्यात येईल. जसे:—

(१) नियुक्ती ही पुढीलपैकी कोणत्याही एका प्रकारे करण्यात येईल.—

(एक) आधीपासून जिल्हा परिषदेच्या सेवेत नसलेले जे उमेदवार ३३ वर्षांपेक्षा अधिक वयाचे नसतील ; आणि

(दोन) उच्च माध्यमिक शाळा प्रमाणपत्र परीक्षा किंवा तुल्य अर्हता परीक्षेत किमान ६० टक्के गुणांसह उत्तीर्ण ;

किंवा

शासनमान्य संस्थेची अभियांत्रिकी पदविका (तीन वर्षांचा अभ्यासक्रम) ;

किंवा

शासनमान्य संस्थेची समाजकल्याणची पदवी (बी.एस.डब्ल्यू.) आणि ;

(तीन) संगणक हाताळणी/वापराबाबत माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेल्या परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्रकाश हिर्लेकर,**
शासनाचे सह सचिव.

**RURAL DEVELOPMENT AND**
**WATER CONSERVATION DEPARTMENT**
Mantralaya, Mumbai 400 032, dated the 25th August 2011

*NOTIFICATION*

THE MAHARASHTRA ZILLA PARISHADS AND PANCHAYAT SAMITIS ACT, 1961.

No. SEPRANI-2011/RR-260/Astha-10.— The following draft of rules further to amend the Maharashtra Zilla Parishads District Service (Recruitment) Rules, 1967, which the Government of Maharashtra proposes to make in exercise of the powers conferred by Clause (XXXIX) of sub-section (*2*) of Section 274 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962) and of all other powers enabling it in that behalf, is hereby previously published as required by sub-section (*3*) of the said section 274.—

1. These rules may be called the Maharashtra Zilla Parishads District Service (Recruitment) Rules, 2011.

2. In Appendix VIII appended to the Maharashtra Zilla Parishads District Service (Recruitment) Rules, 1967 in entry at serial No.3 relating to District Technical Services (Class-III) (Subordinate and Village Extension) Grade-I, against the post of Gram Sewak in column (3) and coloumn (4), for Paragraph 1 the following paragraph shall be substituted namely:—

1. Appointment shall be made by nomination from amongst candidates who—

(*i*) unless already in the service of the Zilla Parishad are not more than 33 years of age ; and

(*ii*) possess atleast Higher Secondary School Certificate or equivalent with minimum 60 per cent marks ;

or

Engineering Diploma (3 years course) from the Governmenmt recognized institutions ;

or

Bachelor of Social Welfare (BSW) from the Government recognized institutions ; and

(*iii*) shall possess the certificate in Computer Operation, prescribed by the Director of Information Technology, Government of Maharashtra, from time to time

By order and in the name of the Governor of Maharashtra,

PRAKASH HIRLEKAR,

Joint Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004. EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.